**जिल्हास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समिती**
**व तालुकास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समिती**
**गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: जिस्तस -२०१५/प्र.क्र.५२/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२२.

<u>वाचा:</u>- शा.नि.क्र.जिस्तस-२०१५ /प्र.क्र.५२/ऊर्जा-५,दि.२६.०३.२०१५

**<u>प्रस्तावना:</u>**

वीज ही अत्यंत महत्वाची सेवा आहे. ग्राहक व वीज वितरण कंपनी यामध्ये संवाद व समन्वय नसल्यास अडचणीच्या प्रसंगी ग्राहकांमध्ये असंतोष निर्माण होऊ नये व महावितरण कंपनीचा कारभार पारदर्शक व प्रभावीपणे चालविण्यासाठी व ग्राहकांना उत्तम व दर्जेदार सेवा पुरविण्यासाठी जिल्हास्तरावर व तालुकास्तरांवर विद्युत वितरण नियंत्रण समित्या संदर्भीय शासन निर्णयान्वये नेमण्यात आल्या आहेत. या समित्यांची संरचना परिशिष्ट- अ व ब मध्ये देण्यात आली असून, समितीच्या कार्यकक्षेबाबतचा तपशिल परिशिष्ट- क व ड मध्ये देण्यात आला आहे.

२. विद्युत अधिनियम, २००३ कलम १६६ (५) नुसार -

अ) प्रत्येक जिल्हयातील विद्युतीकरणाच्या विस्ताराचे समन्वयन व पुनर्विलोकन करण्यासाठी;

ब) वीज पुरवठयाच्या गुणवत्तेचे व ग्राहक संतोषाचे पुनर्विलोकन करण्यासाठी;

क) विजेची कार्यक्षमता वाढविण्यासाठी व तिचे संवर्धन करण्यासाठी राज्य शासनास जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्याचे प्राधिकार आहेत.

त्या अनुषंगाने जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समिती पुर्न:गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे:-

**<u>शासन निर्णय :</u>**

जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय समित्या पुर्न:गठीत करण्यास याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय विद्युत वितरण समित्यांमध्ये ज्या सदस्यांचा अंतर्भाव करावयाचा आहे त्याबाबत माहिती सोबतच्या परिशिष्ट "अ" व "ब" मध्ये देण्यात आली आहे.

३. या समितीची कार्यकक्षा काय राहील याबाबत माहिती परिशिष्ट “क” व “ड" मध्ये देण्यात आली आहे. या कार्यकक्षेत समितीने आपले कार्य पार पाडून विद्युत वितरण विषयक शासनाच्या धोरणाची / निर्णयाची अंमलबजावणी करण्यास मदत करणे अपेक्षित आहे.

४. समितीच्या बैठका दर तीन महिन्यांनी घेण्यात याव्यात व बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयांची मुख्य अभियंता, महावितरण मार्फत अभिप्रायासह शासनास माहिती अवगत करावी.

५. सदर जिल्हास्तरीय समितीचे गठन संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावे. तालुकास्तरीय समितीचे गठन उपविभागीय अधिकारी (SDO) यांनी करावे. समितीचे गठन करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यापूर्वी जिल्हास्तरावरील अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीस मा.पालकमंत्री यांची सहमती संबंधित जिल्हाधिकारी यांनी संबंधित मुख्य अभियंता, महावितरण यांच्या सहकार्याने घ्यावी तसेच उपविभागीय अधिकारी यांनी तालुका स्तरावरील नियुक्त कार्यकारी अभियंता,महावितरण यांच्या सहकार्याने घ्यावी. ही कार्यवाही सदर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात पूर्ण करावी.

६. अशासकीय व शासकीय सदस्यांना प्रचलित नियमांनुसार प्रवास खर्च व देय भत्ते अनुज्ञेय ठरणार नाहीत.

७. जिल्हास्तरीय समितीच्या अशासकीय सदस्यांना जिल्हाधिकारी यांनी व तालुका स्तरीय समितीच्या अशासकीय सदस्यांना उपविभागीय अधिकारी यांनी समितीचे ओळखपत्र द्यावे. अशासकीय सदस्यांच्या समितीवर केलेल्या नियुक्त्या शासनाच्या पुढील आदेशापर्यंत असल्याचे स्पष्टपणे संबंधित आदेशात नमुद करण्यात यावे. सदर पदावर नियुक्त करण्याचे अधिकार अथवा पदमुक्त करण्याचे अधिकार समितीचे अध्यक्ष राखून ठेवीत असल्याचा उल्लेखही आदेशात करण्यात यावा. तालुका स्तरावरील अध्यक्षांना पदमुक्त करण्याचे अधिकार जिल्हयाचे पालकमंत्री यांचे राहतील.

८. सर्व संबंधित मुख्य अभियंता, महावितरण / उपविभागीय अभियंता, महावितरण यांनी संबंधित जिल्हाधिकारी तसेच उपविभागीय अधिकारी यांना समितीच्या गठन प्रक्रियेत सहकार्य करावे.

९. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण, मुंबई यांनी संबंधित जिल्हा व तालुका स्तरावरील समित्यांच्या गठनासाठी संबंधित मुख्य अभियंता / कार्यकारी अभियंता यांना उचित सूचना द्याव्यात व तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांचे मार्फत समिती गठीत करण्याची कार्यवाही विहित कालमर्यादेत पार पाडली जावी याबाबत आवश्यक कार्यवाही करावी. तसेच अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांनी संबंधित उपविभागीय अभियंता यांना तालुका स्तरावरील समितीच्या गठनाबाबत उचित सूचना देण्यात येऊन संबंधित उपविभागीय अभियंता अधिकाऱ्याद्वारे समिती गठीत करण्याची कार्यवाही कालमर्यादेत पार पाडली जाईल या अनुषंगाने कार्यवाही करावी.

१०. या शासन निर्णयानुसार यापूर्वी गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय /तालुकास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समित्या आवश्यकतेप्रमाणे पुर्नःगठीत करण्यात याव्यात.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२१११११८५३४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT
PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2022.02.11 11:24:56 +05'30'

**( प्र. पुं. बडगेरी )**

शासनाचे उप सचिव

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
६. मा.विधान परिषद /विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
७. मा.पालकमंत्री, सर्व जिल्हे.
८. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
९. अध्यक्ष,महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं.१,१३ वा मजला, मुंबई-०५
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कंपनी मर्या., मुंबई-२३.
११. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व, मुंबई-५१
१२. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व. मुंबई-५१
१३. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१४. जिल्हाधिकारी सर्व जिल्हे.
१५. उपविभागीय अधिकारी, सर्व तालुके.
१६. कक्ष अधिकारी, (प्रशासन-२), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.

## परिशिष्ट "अ"

## जिल्हास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समितीची संरचना खालीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | : | मा. पालकमंत्री |
| सदस्य | : | जिल्हयातील सर्व विधान परिषद / विधान सभा सदस्य |
| | : | अध्यक्ष, जिल्हा परिषद |
| | : | महापौर, महानगरपालिका |
| | : | जिल्हाधिकारी |
| | : | मनपा आयुक्त |
| | : | जिल्हा उद्योग अधिकारी |
| | : | प्रादेशिक अधिकारी, एम.आय.डी.सी. |
| | : | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद |
| | : | पोलिस आयुक्त (शहर) |
| | : | पोलिस अधिक्षक (ग्रामीण) |
| | : | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (राज्य क्षेत्र) |
| | : | जिल्हा कृषी अधिकारी (जि.प.) |
| | : | अधिक्षक अभियंता, ग्रामीण / शहर मंडळ, महावितरण |
| | : | अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| | : | अधिक्षक अभियंता, (सं. व सु) महापारेषण अथवा त्यांचे प्रतिनिधी |
| | : | अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी |
| सदस्य सचिव | : | मुख्य अभियंता, महावितरण |
| ग्राहक प्रतिनिधी सदस्य (पालकमंत्री निवडतील ते ग्राहक प्रतिनिधी १ ते ६) | : | १. उद्योग क्षेत्र<br>२.कृषी ग्राहक<br>३. व्यावसायिक विद्युत क्षेत्र<br>४. घरगुती विद्युत क्षेत्र<br>५.वीज वितरण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य केलेली व्यक्ती<br>६. वीज वितरण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य केलेली व्यक्ती |

*****************

## परिशिष्ट “ब”

**तालुकास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समितीची संरचना खालीलप्रमाणे आहे :-**

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | : | मा.पालकमंत्री यांनी शिफारस केलेल्या संबंधित तालुक्यातील सामाजिक क्षेत्रातील काम करणारी व्यक्ती अथवा विधानसभा सदस्य |
| सहअध्यक्ष | : | क्षेत्रातील कार्यकारी अभियंता, महावितरण |
| सदस्य | : | जि.प. सदस्य (सर्व) |
| | : | सभापती, पंचायत समिती |
| | : | नगराध्यक्ष, तालुक्यातील सर्व नगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती |
| | : | सभापती, कृषी उत्पन्न ( ए.पी.एम.सी.) |
| | : | तहसीलदार |
| | : | उपविभागीय पोलीस अधिकारी |
| | : | गट विकास अधिकारी |
| | : | तालुका, कृषी अधिकारी, पं.स. |
| | : | तालुका, कृषी अधिकारी, राज्यक्षेत्र |
| | : | विद्युत निरीक्षक यांनी नामनिर्देशित केलेला प्रतिनिधी |
| सदस्य सचिव | : | उपविभागीय अभियंता, महावितरण (तालुक्यातील जास्त कार्यक्षेत्र असणारा) |
| प्रतिनिधी (१ ते ६ सदस्य पालकमंत्री निवडतील ते प्रतिनिधी) | | १. उद्योग क्षेत्र ग्राहक<br>२. कृषी क्षेत्र ग्राहक<br>३. व्यावसायिक ग्राहक<br>४. घरगुती ग्राहक<br>५. वीज वितरण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करणारी व्यक्ती<br>६. वीज वितरण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करणारी व्यक्ती |

*************

## परिशिष्ट “क”

**जिल्हास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-**

१. महावितरणतर्फे सूरु असलेल्या राज्य पुरस्कृत, केंद्रपुरस्कृत व इतर कार्यान्वित असलेल्या योजना व योजनेतील कामे, देखभाल दुरुस्ती इत्यादी कामांचा आढावा घेणे.

२. महावितरणतर्फे विद्युत बिलांच्या वसुलीसाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांचा आढावा घेणे.

३. जिल्हयातील विजेचा गैरवापर रोखणे व त्यासाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांचा आढावा घेणे

४. जिल्हयातील पैसे भरुनही विद्युत जोडणी न मिळालेल्या कृषिपंप, घरगुती ग्राहकांच्या व वर्गवारीनिहाय नवीन प्रलंबित जोडण्यांचा आढावा घेणे.

५. सौर कृषीपंप वीज जोडण्यांच्या कामावर देखरेख ठेवणे व आढावा घेणे.

६. जिल्हयात सुरळीत अखंडीत व खात्रीशीर विद्युत पुरवठा व्हावा, ग्राहकांना व्यवस्थित सेवा मिळावी यासाठी मार्गदर्शन करणे.

७. विद्युत अपघातासंबंधी नुकसान भरपाईची प्रकरणे, विद्युत निरिक्षकांनी कळविलेल्या आक्षेपांची पूर्तता यांचा आढावा.

८.समित्यांचे कामकाज योग्य पध्दतीने चालविण्यासाठी कालावधी निश्चित करणे. त्रैमासिक एक निश्चित तारीख ठरवावी व त्या दिवशी ती बैठक झालीच पाहिजे,असे बंधन असावे. सदस्य सचिवाने बैठकीचे आयोजन अध्यक्षांची वेळ घेऊन करावे.

९. समिती बैठकीत झालेली चर्चा व निर्णय योग्य माध्यमाद्वारे प्रसिध्द केले जावे.

१०. समितीचे माध्यमातून मांडल्या गेलेल्या सूचनांची त्वरीत दखल घ्यावी व तांत्रिकदृष्ट्या त्यांस तपासून योग्य तो निर्णय घेऊन संबंधितांना कळवावे.

११. समितीने नवीन प्रकल्प/ योजना सुचविल्यास त्याचा विचार करुन सक्षम प्राधिकरणाकडे प्रस्ताव पाठवून मंजूर करणे. निधी मिळविणे.

१२. समितीने वितरण कंपनी व ग्राहक यांच्यात समन्वय व संवाद साधावा.

१३. समितीसमोर ग्राहकांना त्यांची कैफियत / तक्रार मांडायची असेल तर तशी आगाऊ लेखी सूचना / तक्रार मागवून त्याला ती मांडण्याची व्यवस्था असावी.

१४. सदस्य महोदयांचा त्या त्या स्तरावर योग्य तो सन्मान राखला जाईल याची दक्षता घ्यावी.

१५. सदस्यांना वीज वितरण कंपनीकडून ओळखपत्र द्यावे.

१६. महसूल वसूलीचे १००% उद्दिष्ट पूर्ण करणे, विजेची हानी कमी करणे, ग्राहक सेवा देणे व वीज वितरण क्षेत्रामध्ये उत्कृष्ट कार्य करणाऱ्या जिल्हयातील एक कार्यकारी अभियंता / दोन अतिरिक्त कार्यकारी अभियंता / दोन उपकार्यकारी अभियंता / दोन सहाय्यक अभियंता / दोन वरिष्ठ तंत्रज्ञ / दोन कनिष्ठ तंत्रज्ञ इतक्या अधिकारी / कर्मचाऱ्यांची वार्षिक निवड करुन त्यांचा सत्कार जिल्हास्तरीय बैठकीत करण्यात यावा.

१७. नव्याने होत असलेल्या प्रकल्पांच्या गुणवत्तेवर लक्ष देणे.

१८. विजेच्या पायाभूत सुविधा / देखभाल इत्यादी करीता जिल्हा नियोजन समिती / सामाजिक न्याय / अदिवासी विकास विभाग / शासनाचे इतर विभाग यांचेकडून निधी मिळविणे.

१९. वार्षिक जनता दरबार आयोजित करुन जनतेच्या समस्या सोडविणे.

२०. नैसर्गिक आपत्तीने उध्दवस्त झालेल्या पायाभूत सुविधा पुनर्स्थापन करण्याकरिता राज्याच्या मदत व पुनर्वसन खात्याकडे निधीची मागणी करणे.

२१. एनर्जी कॉन्झरवेशन पॉलिसीनुसार जिल्हयातील विजेची बचत करण्याकरीता उपाययोजना राबविणे.

२२. अपारंपारिक ऊर्जा स्त्रोत तयार करुन अपारंपारिक ऊर्जा निर्माण करण्याचे प्रयत्न करणे.

**************

## परिशिष्ट “ड”

### तालुकास्तरीय विद्युत वितरण नियंत्रण समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-

१. महावितरणतर्फे ग्राहकांना दिल्या जाणाऱ्या अखंडीत वीज सेवेचा आढावा घेणे.

२. महावितरणतर्फे विद्युत बिलांच्या वसुलीसाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांचा आढावा घेणे.

३. विजेचा अनधिकृत वापर रोखणे व त्यासाठी महावितरणकडून केल्या जाणाऱ्या उपाययोजनांचा आढावा घेणे / विजेची चोरी थांबविणेकरीता उपाययोजना करणे.

४. प्रलंबित नवीन वर्गवारी निहाय जोडण्यांचा आढावा घेणे.

५. महावितरणतर्फे सुरु असलेल्या पायाभूत, देखभाल दुरुस्ती व तत्सम कामांचा आढावा घेणे.

६. सदस्यांकडून नवीन पायाभूत कामाबाबत / देखभाल दुरुस्तीबाबत आलेल्या सूचना घेऊन चर्चा करणे.

७. महावितरणच्या थकबाकी वसूलीबाबत जनजागृती व चर्चा करणे.

८. वीज वाहिन्यांची सुव्यवस्था व देखरेख ठेवणे. गावातील जिर्ण व जुन्या लाईनच्या देखभाल / दुरुस्तीबाबत योजना तयार करणे.

९. विजेचे अपघात टाळण्याबाबत जनमाणसात जनजागृती करण्याबाबत चर्चा करणे व गावातील ग्राहकांना वेळोवेळी वीज सुरक्षिततेची माहिती देणे, अनधिकृत वीज जोडण्या घेण्यापासून परावृत्त करणे.

१०.वीज वाहिन्यांच्या उभारणीच्या कामात येणारे अडथळे दूर करणे.

११. Energy Conservation Policy ची अंमलबजावणी करणे.

१२. भारनियमन कमी करण्याकरिता चर्चा करुन खालील बाबी राबविणे.

(१) ट्रान्सफॉर्मर बिघाड व जळण्याचे प्रमाण कमी करण्याकरीता जनजागरण करणे.

(२) वितरण हानी कमी करणे.

(३) वेळेवर वीज बील भरण्याबाबत ग्राहकांना प्रवृत्त करणे.

(४) थकबाकी वसूली मोहिम राबविणे.

(५) वीजचोरी शोध मोहिमेस मदत करणे.

(६) वीज चोरी करणाऱ्याबाबत माहिती घेवून मोहिम सुरु करणे.

१३.अपारंपारिक उर्जा क्षेत्राबाबत नियोजन करणे.

१४. वीज बीलाबाबत उद्भवणाऱ्या तक्रारींवर चर्चा करुन निवारण करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करणे.

१५.समन्वय समितीचा त्रैमासिक अहवाल मुख्य विद्युत निरिक्षक यांच्या कार्यालयास सादर करणे.

१६.नव्याने होत असलेल्या प्रकल्पांच्या गुणवत्तेवर लक्ष देणे.

१७.विजेच्या पायाभूत सुविधा / देखभाल इत्यादी करीता जिल्हा नियोजन समिती / सामाजिक न्याय /आदिवासी विकास विभाग / शासनाचे इतर विभाग यांचेकडून निधी मिळविणे.

१८.दर तीन महिन्यांनी बैठक आयोजित करण्याची जबाबदारी सदस्य सचिव यांची राहिल. अध्यक्षांसोबत चर्चा करुन वेळ निश्चित करावी व नियमित बैठक घ्यावी.

१९. विद्युत अपघातासंबंधी नुकसान भरपाई प्रकरणे, विद्युत निरिक्षकांनी कळविलेल्या आक्षेपांची पूर्तता यांचा आढावा.

२०. अपघात प्रवण स्थळांची निश्चिती व अनुषंगिक उपाययोजना

*************